**सार्वजनिक ठिकाणी करण्यात येणा-या जाहिराती, होर्डींग्स तसेच इतर बाबींमुळे होत असलेले विद्रुपीकरण थांबविण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन परिपत्रक क्रमांक- एमआयएस -२०१४ / प्र.क्र. १२०३ / पोल - ११

गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र,
तिसावा मजला, कफ परेड, मुंबई - ५.
तारीख: १८ सप्टेंबर,२०१४

**वाचा - क्र. एमआयएस २०१४/प्र.क्र. १२०३/पोल -११, दिनांक ०१.०९.२०१४**

## परिपत्रक

अवैध जाहिराती फलक, होर्डींग्स संदर्भात कारवाई करण्याबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथे सार्वजनिक जनहित याचिका क्र. ३७ / २०१० जनहित मंच व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर दाखल करण्यात आलेली होती. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ यांनी यासंदर्भात कारवाई करण्यासाठी शासनास काही अंतरीम आदेश दिलेले आहेत. त्यास अनुसरून या प्रकरणी सदर परिपत्रकान्वये राज्यातील सर्व पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांना खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

१) महाराष्ट्र प्रिव्हेंशन ऑफ डिफेसमेन्ट ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट, १९९५ मधील तरतुदींच्या अनुषंगाने महानगरपालिकेच्या अधिका-यांद्वारे कार्यवाही करण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर वरिष्ठ पोलीस निरिक्षक, अथवा प्रभारी अधिकारी, स्थानिक पोलीस ठाणे, हे महानगरपालीका कर्मचा-यांना अनधिकृत होर्डींग / बॅनर्स हटविण्याकरीता पुरेसे पोलीस संरक्षण पुरवतील. यावेळी महानगरपालीका कर्मचा-यांना कमीत कमी दोन हत्यारी पोलीस शिपाई पुरविण्याची व्यवस्था करण्यात यावी.

२) जेव्हा महानगरपालिकेचे अधिकारी, डिफेसमेंट ॲक्ट मधील तरतुदीनुसार गुन्हा घडल्याचे कळवतील (यामध्ये तोंडी कळविल्याचा समावेश राहील.) तेव्हा संबंधीत पोलीस ठाण्याचे प्रभारी अधिकारी यांचेवर सदर गुन्ह्याबाबत या कायद्यानुसार जर तो गुन्हा दखलपात्र असेल तर तो गुन्हा नोंद करणे बंधनकारक राहील.

३) ज्या महानगरपालिका कार्यक्षेत्रामध्ये पोलीस आयुक्तालये आहेत त्या ठिकाणी संबंधित पोलीस आयुक्त हे एक किंवा त्यापेक्षा जास्त वरिष्ठ पोलीस अधिका-यांची (पोलीस उप आयुक्त दर्जापेक्षा कमी नाही) समन्वय अधिकारी (नोडल ऑफिसर) म्हणून नियुक्ती करतील. सदर समन्वय अधिकारी वरिष्ठ पोलीस निरिक्षक, अथवा संबंधित स्थानिक पोलीस ठाण्याचे प्रभारी अधिकारी यांच्या याबद्दलचा कामकाजावर नियंत्रण ठेवतील. मुंबई व पुणे या सारख्या मोठया शहरांमध्ये एक पेक्षा जास्त

समन्वय अधिका-यांची नियुक्ती करण्यात येईल. ज्या महापालिका क्षेत्रामध्ये पोलीस आयुक्तालय नाहीत त्या क्षेत्रामध्ये जिल्हा पोलीस अधीक्षक हे समन्वय अधिका-यांची (पोलीस उप अधीक्षक दर्जापेक्षा कमी नाही) नियुक्ती करतील. ज्या ठिकाणी स्थानिक पोलीस ठाण्यामधील अधिकारी महापालिका अधिका-यांच्या तक्रारीकडे दुर्लक्ष करतील अशा ठिकाणी संबंधित महापालिका अधिकारी याबाबत सदर समन्वय अधिका-याकडे लेखी तक्रार करतील. सदर तक्रारीच्या अनुषंगाने समन्वय अधिकारी यांचेव्दारे योग्य त्या उपाययोजना त्वरीत करण्यात याव्यात.

४) रात्रीची गस्त करणारे पोलीस कर्मचारी व बीट मार्शल यांना अनधिकृत होर्डींग्स बॅनर, पोस्टर्स लावण्यात येवू नयेत याबाबत नेहमी सतर्क राहण्याबाबत पोलीस आयुक्त / जिल्हा पोलीस अधीक्षक यांचेमार्फत सुचना देण्यात याव्यात. तसेच जर अशा घटना सदर कर्मचा-यांच्या निदर्शनास आल्यास सदर कर्मचा-यांना गुन्हा नोंद करण्याबाबतच्या सूचना देण्यात याव्यात.

५) पोलीस समन्वय अधिका-यांची तात्काळ नियुक्ती करण्यात यावी. नेमणूक केलेल्या अधिका-यांसंदर्भात प्रसिध्दी प्रसारमाध्यमातून तसेच वेबसाईडच्या माध्यमातून देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१८१४३८३७१७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: CN = Punam Hiraman Wagde, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.09.18 15:52:49 +05'30'

**(पु. हि. वागदे)**

सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

(१) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(२) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

(४) सर्व आयुक्त, महानगरपालिका

(५) सर्व पोलीस आयुक्त,

(६) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा

(७) सर्व पोलीस अधीक्षक

(८) मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका

(९) पोल -११ (निवड नस्ती)